शासकीय / अशासकीय अनुदानित/
कायम विनाअनुदानित महाविद्यालये/
संस्थामध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी
आधार क्रमांकाची नोंदणी करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन परिपत्रक क्र. टीईएम-२०१४/१३९६/प्र.क्र.२७२/तांशि-४
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- ०८ जून, २०१५

**परिपत्रक :**

आधार कार्डाचा व्यापक प्रमाणावर वापर करण्यासंदर्भात मा. पंतप्रधान यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०६/०९/२०१४ रोजी बैठक आयोजीत करण्यात आली होती. सदर बैठकीत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासंदंर्भात उपमहासंचालक (UIDIA) यांनी दि. १७/०९/२०१४ च्या पत्रान्वये राज्य शासनास कळविले आहे.

२. आधार क्रमांक हा अधिकृत पुरावा मानलेला आहे. केंद्र शासनाच्या निर्देशांनुसार शिष्यवृत्ती, एलपीजी, पेन्शन, पासपोर्ट, जनधन योजना, मनरेगा, मोबाईल फोन, रेल्वे रिझर्वेशन इत्यादी क्षेत्रामध्ये आधार क्रमांकाचा वापर करण्यासाठी यासंबंधीच्या सर्व Database चे संगणीकरण करण्यात येणार आहे. ही सर्व माहिती आधार क्रमांकाशी Link up करण्यासाठी UIDIA कडून Standard Protocol विकसीत करण्यात येणार आहे. तसेच आधार क्रमांकाद्वारे विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्ती व इतर संबंधित शैक्षणिक योजनांची अधिक चांगल्या पध्दतीने अंमलबजावणी करणे शक्य होईल.

३. उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारीतील सर्व शैक्षणिक संस्थामध्ये शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यांचा तपशिल Data on Click पद्धतीने तात्काळ उपलब्ध होण्याच्या दृष्टीने आणि विविध योजनांतर्गत लाभार्थी विद्यार्थ्यांना अचूकपणे लाभ देण्यासाठी आधार क्रमांकाची व त्यांच्या बँक खात्याची नोंद करणे आवश्यक आहे. त्यामुळे उच्च शिक्षण / व्यवसायिक शिक्षण घेणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांच्या आधार क्रमांक व त्यांच्या बँक खाते क्रमांकाची नोंदणी करण्यात यावी. या संदर्भात उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारित असलेल्या शासकीय / अशासकीय अनुदानित/ कायम विनाअनुदानित महाविद्यालये/ संस्थाच्या प्राचार्य / संचालक यांनी व्यक्तीशः लक्ष घालून संस्थास्तरावर विद्यार्थ्यांच्या आधार क्रमांकाची नोंदणी करण्यासाठी संबंधीत यंत्रणेशी संपर्क साधून विशेष मोहिम राबवावी. तसेच सर्व विद्यार्थ्यांची बँक खाते क्रमांकासह संपूर्ण माहिती ही संबंधित विद्यार्थ्यांच्या आधार क्रमांकाशी संलग्नित करावी. सदरची कार्यवाही प्राथम्याने ताक्ताळ करुन याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०८१७११२०१८०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kiran Ashok Jadhav

Digitally signed by Kiran Ashok Jadhav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kiran Ashok Jadhav
Date: 2015.06.08 17:13:20 +05'30'

**( किरण जाधव )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व जिल्हाधिकारी,

२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

४) संचालक, (प्रशिक्षण/ व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६) निवड नस्ती, तांशि-१.

**प्रत :**

१) सहसचिव (व्य. शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) उपसचिव (म.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) उपसचिव (वि.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) उपसचिव (आस्था). उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.